सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांना अनुदानाचे वितरण.

मुख्य लेखाशिर्ष-२४१५ ०६२४. दुसरा हप्ता (वेतन)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२४/प्र.क्र.४९/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई- ४०० ००१.
दिनांक : ०६ ऑगस्ट, २०२४.

वाचा :

१. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शा.नि.क्र. प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि. १७.०९.१९९३.
२. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शा.नि. क्र.- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दि. २३.९.१९९८
३. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शा.नि.क्र.-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि. १२.६.२००१.
४. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शा.नि.समक्रमांक, दि.३०.४.२०२४.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ.-३, दि.२५.०७.२०२४.

प्रस्तावना -

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण ०१- पीकसंवर्धन, १२०, शासकीय संस्थांना सहाय्यक अनुदाने (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र (अनिवार्य) (संकेतांक क्र.२४१५ ०६२४), (योजनेत्तर) (दत्तमत) (मागणी क्र. एल-३) अंतर्गत ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रे यांना ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रु.४९,१२,०००/- (रुपये एकोणपंन्नास लक्ष बारा हजार फक्त) व ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.७,२३,६९,०००/- (रुपये सात कोटी तेवीस लक्ष एकोणसत्तर हजार फक्त) अशी एकूण रु.७,७२,८१,०००/- (रुपये सात कोटी बहात्तर लक्ष एक्याऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी दुसरा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांना संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता रु.२,४१,२३,०००/- (रुपये दोन कोटी एक्केचाळीस लक्ष तेवीस हजार फक्त) इतका निधी पहिला हप्ता म्हणून उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. आता, वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ.-३, दि.२५.०७.२०२४ नुसार ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांना ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या एकुण ७०% मर्यादेत पहिला हप्ता वजा जाता उर्वरीत रु.२,६५,३५,३००/- (रुपये दोन कोटी पासष्ठ लक्ष पस्तीस हजार तीनशे फक्त) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग, क्रमांक प्रशिक्षण- ११९८/प्र.क्र.५८१/६१, दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय पुणे, छ.संभाजीनगर, नागपूर व अमरावती विभाग यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च "मागणी क्र.एल ३,२४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण(०१)पीक संवर्धन १२०-शासकीय संस्थांना सहायक अनुदाने (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र अनिवार्य संकेतांक क्र. (२४१५ ०६२४) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) व ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरित करताना वेतन/वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरित केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन/वेतनेतरकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतरकरिता अनुदान वितरित करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७.  या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८.  हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०८०५१७४१०५२३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SNEHAL AMOL ADSUL

Digitally signed by SNEHAL AMOL ADSUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=05051e747e50e5d78313de8efdbf69b6204fe284022f1c89cb32725845b82f98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A62914B6668CCC7D4F19B82DDC019530BC32C57451ADF55978B8FDA328F80D7, cn=SNEHAL AMOL ADSUL
Date: 2024.08.06 13:12:23 +05'30'

(स्नेहल अडसूळ)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
२. विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर,अमरावती व छ.संभाजीनगर (प्रत्येकी २ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे, नागपूर,अमरावती व छ.संभाजीनगर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, कोल्हापूर, बुलडाणा, जालना, परभणी व चंद्रपूर.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म पुणे, कसबाबावडा कोल्हापूर, जालना, परभणी, सिंदेवाही जि. चंद्रपूर, व बुलडाणा.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ग्राम विकास विभाग
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.अनुग्रा-२०२४/प्र.क्र. ४९/आस्था-१५, दि.०६ ऑगस्ट, २०२४ | | | |
|---|---|---|---|
| सन २०२४-२५ या कालावधीतील दुसऱ्या हप्त्याचे वितरण (प्रत्यक्षात रुपये) | | | |
| अ.क्र. | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतन | एकुण |
| १ | मांजरी फार्म, पुणे | ६२,९९,३०० | ६२,९९,३०० |
| २ | कसबा बावडा, कोल्हापूर | ४०,६०,००० | ४०,६०,००० |
| अ | विभागीय आयुक्त, पुणे | १,०३,५९,३०० | १,०३,५९,३०० |
| ३ | जालना | ४७,५०,००० | ४७,५०,००० |
| ४ | परभणी | ४७,५०,००० | ४७,५०,००० |
| ब | विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर | ९५,००,००० | ९५,००,००० |
| ५ | सिंदेवाही, चंद्रपूर | २१,७६,००० | २१,७६,००० |
| क | विभागीय आयुक्त, नागपूर | २१,७६,००० | २१,७६,००० |
| ६ | बुलढाणा | ४५,००,००० | ४५,००,००० |
| ड | विभागीय आयुक्त, अमरावती | ४५,००,००० | ४५,००,००० |
| एकूण (अ+ब+क+ड) | | २,६५,३५,३०० | २,६५,३५,३०० |

SNEHAL AMOL ADSUL

Digitally signed by SNEHAL AMOL ADSUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=05051e747e50e5d78313de8efdbf69b6204fe284022f1c89cb32725845b82f98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A62914B6668CCC7D4F19B82DDC019530BC32C57451ADF55978B8FDA328F80D7, cn=SNEHAL AMOL ADSUL
Date: 2024.08.06 13:13:38 +05'30'

(स्नेहल अडसूळ)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.